माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१४/१६३/प्र.क्र.६१/३४-अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

तारीख : २६ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

1. **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक : ३१.१.२०१४,**
2. **या विभागाचा समक्रमांकाचा दि.१५.३.२०१४ चा शासन निर्णय.**

**शासन निर्णय**

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि. ३१.१०.२०१३ रोजी दिलेल्या निदेशाचे पालन करण्यासाठी शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विविध नागरी सेवा मंडळे स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात आले आहे.

.२ सदर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय रद्द करुन माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील गट-अ व गट- ब मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | सचिव (मा.व ज.), सामान्य प्रशासन विभाग | : | अध्यक्ष |
| २) | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई | : | सदस्य |
| ३) | सह/ उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | सदस्य |

३ हे मंडळ ग्रंथपाल गट-ब, सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने, सहायक संचालक (प्रशासन), गट-ब, वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/ जिल्हा माहिती अधिकारी /वरिष्ठ उपसंपादक/जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ), वरिष्ठ सहायक संचालक (प्रशासन), गट-अ (कनिष्ठ), संशोधन अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) तसेच उपसंचालक (माहिती), उपसंचालक (प्रदर्शने), गट-अ व संचालक (माहिती), गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२६१६५४४३५३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2015.02.26 17:04:48 +05'30'

**( रा.ना.मुसळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. राज्यमंत्री (मा.व ज.) यांचे स्वीय सहायक,
३. सचिव (मा. व ज.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (सा.वि.स. व विभागीय चौकशी अधिकारी-२), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का-३४ अ,
८. सह/ उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती.